कोयना प्रकल्प टप्पा १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील जावळी व महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१८/२१७/प्र.क्र.५७/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २७/०६/२०१८

**वाचा** -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि. १.८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि. २८.३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७/०४/२०१५
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थसंकल्प-३, दि.१८/०४/२०१७
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१६/३३४/प्र.क्र.५४/र-८, दि २७/१२/२०१६
६) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१६/४२१/प्र.क्र.६३/र-८, दि. ०९/०१/२०१७
७) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं-२०१७/३०१/प्र.क्र.७६/र-८, दि. १७/१०/२०१७
८) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१८/प्र.क्र.३६/र-८, दि. २७/०३/२०१८
९) कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र. २, सातारा यांचे पत्र क्र. धोकावि-२/लेशा-२/कोपु/१२३४, दि. १९/०४/२०१८
१०) महसूल व वन विभाग शासन पत्र क्र. पुनर्व-२०१८/२१७/प्र.क्र.५७/र-८, दि. २५/०५/२०१८
११) कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र. २, सातारा यांचे पत्र क्र. धोकावि-२/लेशा-२/१८०३, दि. ०६/०६/२०१८

**प्रस्तावना** -

कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील जावळी व महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ५ व ६ येथील आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्या आहेत. त्यानूसार सदर कामांकरिता कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र. २, सातारा यांनी संदर्भाधिन क्र. ९ येथील पत्रान्वये कोयना प्रकल्पांतर्गत पूर्ण/प्रगतीपथावरील कामांकरिता मोघम निधी मागणी प्रस्ताव सादर केला होता. तदनंतर निधी मागणी प्रस्तावामधील त्रुटींची पुर्तता करणेबाबत संदर्भाधिन शासन पत्र क्र. १० अन्वये कळविण्यात आले होते. त्यास अनुसरुन, कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र.२,सातारा यांनी संदर्भाधिन क्र. ११ येथील पत्रान्वये कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पूर्ण झालेल्या/प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी रु. ७३.१६ लक्ष चा निधी मागणी प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार प्रकल्पयंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावातील प्रशासकीय मान्यता प्रदान पूर्ण/प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांसाठी त्यांच्या स्वीकृत निविदा किंमतीनुसार सद्यस्थितीत झालेल्या कामाची टक्केवारी लक्षात घेऊन रु. ६९.०५ निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

२. प्रकल्पयंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावानुसार पूर्ण झालेल्या/प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी प्रशासकीय मान्यता किंमत मर्यादेत निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय-**

त्यानुसार , कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील जावळी व महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पूर्ण झालेल्या/प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी एकुण रु. ६९.०५ लक्ष निधी सन २०१८-१९ या चालु वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**त्यानुसार, वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील जावळी व महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पूर्ण झालेल्या/प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु. ६९.०५ लक्ष (अक्षरी रुपये एकोनसत्तर लक्ष पाच हजार फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-१०, लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)(कार्यक्रमावरील खर्च) " या लेखाशीर्षाखाली सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात उपलब्ध तरतूदीतून विभागीय आयुक्त, पुणे यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांनी नागरी सुविधा कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता धोम कालवे विभाग क्र.२, सातारा यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा

करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१८-२०१९ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२७११४४५०६७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.06.27 11:51:06 +05'30'

**(दयानंद शं. मुंजाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सातारा
४. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा
५. कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र. २, सातारा
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)

८. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
९. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
१०.वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
११.नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२.महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१३.महसूल व वन विभाग , पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय, मुंबई ३२.
१४.निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*****

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१८/२१७/प्र.क्र.५७/र-८, दि. २७/०६/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**कोयना प्रकल्प टप्पा क्र. १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील जावळी व महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांकरिता वितरीत निधीचा तपशील**

| अ क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामाचे नाव | वितरीत निधी (रु. लक्ष) |
|---|---|---|---|
| | | **ता. महाबळेश्वर, जि. सातारा** | |
| १ | चतुरबेट-न्हावीवस्ती व चतुरबेट-ढेबेवस्ती | चतुरबेट-ढेबेवस्ती व न्हावीवस्ती पोहोच रस्त्यास मो-या बांधकाम करणे | ९.० |
| २ | -- | महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांची अंदाजपत्रके बाहयस्रोतांकडून तयार करुन घेणे | १.३५ |
| ३ | भिमनगर हरचंदी | स्मशानभूमी शेड | २.१ |
| ४ | भिमनगर हरचंदी | ग्रामपंचायत कार्यालय | ५.० |
| | | **ता. जावळी, जि. सातारा** | |
| ५ | शेंबडी खुर्द | संरक्षक भिंतीचे बांधकाम करणे | ५.३८ |
| ६ | अंबवडे कारगाव | स्मशानभूमी रस्त्यास पेव्हींग ब्लॉक बसवणे (३०० मीटर) | १३.९८ |
| ७ | अंबवडे कारगाव | अंतर्गत रस्त्यास पेव्हींग ब्लॉक बसवणे (३०० मीटर) | १३.६० |
| ८ | शेंबडी फळणी | पोहोच रस्त्यास डांबरीकरण करणे | ९.३२ |
| ९ | -- | जावळी तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांची अंदाजपत्रके बाहयस्रोतांकडून तयार करुन घेणे | १.३२ |
| १० | कळकोशी | ग्रामपंचायत कार्यालय | ८.० |
| | | **एकुण** | **रु. ६९.०५** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.06.27 11:51:30 +05'30'

**(दयानंद शं. मुंजाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**